राज्यातील सर्व स्थानिक स्वराज्य संस्थामध्ये साथीचे रोगांचा फैलाव रोखण्यासाठी उपाययोजना करण्याबाबत

# महाराष्ट्र शासन

## नगर विकास विभाग

**शासन परिपत्रक क्रमांक : संकीर्ण-२०१६/प्र.क्र. ४६४ /नवि-२०**

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

दिनांक:- ०२ नोव्हेंबर, २०१६.

**वाचा :-** शासन परिपत्रक, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक :- साथरो-२०१५/प्र.क्र.४९७ /आ-५, दि. ०१ जुलै, २०१६

**प्रस्तावना** :-

पावसाळा ऋतू हा अनेक साथीच्या रोगांचा कालावधी असतो. या कालावधीत बऱ्याच वेळा जलजन्य तसेच किटकजन्य आजारात वाढ होताना दिसते. स्वाईन फ्लू, हिवताप, चिकनगुनिया इ. सारखे साथीचे आजार या कालावधीत वाढीस लागू शकतो. साथीचे रोगांचा फैलाव रोखण्यासाठी स्थानिक स्वराज्य संस्थामध्ये उपाययोजना करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन परिपत्रक :-**

राज्यातील सर्व स्थानिक स्वराज्य संस्थामध्ये साथीचे रोगांचा फैलाव होऊ नये तसेच असे रोग उद्भवल्यास रूग्णांना तात्काळ सेवा उपलब्ध करून द्यावा यासाठी शासन परिपत्रक, सार्वजनिक आरोग्य विभाग, दिनांक ०१ जुलै,२०१६ मध्ये दिलेल्या मार्गदर्शक सूचनांची अंमलबजावणी सर्व स्थानिक स्वराज्य संस्थामध्ये काटेकोरपणे करण्यात यावी.

२. श्री.विष्णू बाबाजी गवळी यांनी जनहित याचिका क्र.२३७ /२०१४ मा.उच्च न्यायालय दाखल करण्यात आली असून मा.उच्च न्यायालयाने दिनांक २५ ऑक्टोबर, २०१६ रोजी निर्णयाच्या अनुषंगाने खालीलप्रमाणे निदेश दिले आहेत :-

> Municipal Corporations should immediately take steps, to contain various diseases namely Malaria, Dengue etc. and to take steps to ensure that there is eradication of these diseases. For that purpose, we direct the state Government and all the municipal Corporations to ensure that emphasis is given on prevention of these diseases by taking appropriate steps such as fumigation on regular basis every day and removal of stagnant water where-ever it is found. There has to be an appropriate garbage disposal plant which is other source for spread up of these diseases.

३. मा.उच्च न्यायालयाने सदर प्रकरणी दि.२५ ऑक्टोबर, २०१६ रोजी दिलेल्या आदेशांचे सर्व नागरी स्थानिक संस्थांनी अनुषंगाने तसेच सर्व नियोजन प्राधिकरणांनी काटेकोरपणे अंमलबजावणी करावी व त्यानुसार तात्काळ कार्यवाही करावी. तसेच साथीचे रोगांचा फैलाव होऊ नये म्हणून उपाययोजना करण्यात याव्या.

४. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्राच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक २०१६१२०२१६५९१३५०२५ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Jayasingrao N Patil

Digitally signed by Jayasingrao N Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Jayasingrao N Patil
Date: 2016.12.02 17:01:41 +05'30'

**(ज. ना. पाटील)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति :-**

१) मा.विरोधी पक्षनेते, दोन्ही सभागृह, महाराष्ट्र विधानमंडळ, मुंबई
२) सर्व सन्मानीय विधानसभा / विधानपरिषद व संसद सदस्य
३) मा.राज्यपाल महोदय यांचे सचिव
४) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
५) सर्व मा.मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
६) प्रधान सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई
७) मा.राज्य निवडणूक आयोग यांचे कार्यालय
८) मा.मुख्य सचिव यांचे वरीष्ठ स्वीय सहाय्यक
९) मा.लोकआयुक्त व उपलोकआयुक्त यांचे कार्यालय
१०) मुख्यमंत्री महोदय यांचे जनसंपर्क अधिकारी
११) महानगर आयुक्त, मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, बांद्रा (पुर्व), मुंबई
१२) व्यवस्थापकीय संचालक, सिटी ॲन्ड इंडस्ट्रियल डेव्हलपमेंट कार्पोरेशन, नवी मुंबई
१३) सभापती, नागपूर सुधार प्रन्यास, नागपूर
१४) सर्व विभागीय आयुक्त
१५) सर्व जिल्हाधिकारी
१६) राज्यातील सर्व महानगरपालिकांचे आयुक्त
१७) आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई
१८) राज्यातील सर्व नगरपरिषदा / नगरपंचायती यांचे मुख्याधिकारी
१९) मुख्य कार्यकारी अधिकारी, पिंपरी-चिंचवड नवनगर विकास प्राधिकरण, निगडी, पुणे
२०) निवडनस्ती (नवि-२०)